**मंत्रालयीन विभागातील कक्ष अधिकारी या संवर्गाची वर्षनिहाय पदसंख्या निश्चित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
शासन निर्णय क्रमांकः कअनि -१११५ /प्र.क्र. ३/२०१५ /१४-ब
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीखः १३ जानेवारी, २०१५

वाचा - १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक सीसीए-१७०९/प्र.क्र.१३९/२००९/१४-ब, दिनांक २६ मे, २०११.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक सीसीए-१७१२/प्र.क्र.५५/२०१२/१४-ब, दिनांक २ सप्टेंबर, २०१३.

## शासन निर्णय

संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये १९८६ ते २००० या प्रत्येक वर्षाच्या दिनांक १ जानेवारी रोजीची मंत्रालयीन विभागातील कक्ष अधिकारी संवर्गातील मंजूर पदसंख्या निश्चित करण्यात आली आहे. संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये २००१ ते २०१३ या प्रत्येक वर्षाच्या दिनांक १ जानेवारी रोजीची मंत्रालयीन विभागातील कक्ष अधिकारी संवर्गातील मंजूर पदसंख्या निश्चित करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने २०१४ व २०१५ या प्रत्येक वर्षाच्या दिनांक १ जानेवारी रोजीची कक्ष अधिकारी संवर्गातील मंजूर पदसंख्या निश्चित करण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता. मंत्रालयीन विभागातील कक्ष अधिकारी संवर्गाची वर्ष २०१४ व २०१५ या प्रत्येक वर्षाच्या दिनांक १ जानेवारी रोजीची कक्ष अधिकारी संवर्गाची मंजूर पदसंख्या खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे.

| अ.क्र | वर्ष | मंजूर पदसंख्या |
|---|---|---|
| १ | दिनांक १.१.२०१४ | ७४३ |
| २. | दिनांक १.१.२०१५ | ७४५ |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०११३११५८०६५५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Karbhari Jondhale

Digitally signed by Satish Karbhari Jondhale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400020, st=Maharashtra, cn=Satish Karbhari Jondhale
Date: 2015.01.13 12:07:40 +05'30'

**(स.का.जोंधळे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना), मुंबई - ४०० ०३२.
२. सामान्य प्रशासन विभाग, का.क्र.१४, १४-अ.
३. निवडनस्ती